रद्द करण्यात आलेले इरादापत्र शैक्षणिक वर्ष २०२५-२६ करीता पुनर्स्थापित करणेबाबत.
(न्यायालयीन प्रकरण).

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग,**
**शासन निर्णय क्र. मान्यता-२०२५/ई:९४८९७९/मशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मुंबई - ४०० ०३२
दिनांक: ११ जून,२०२५.

**<u>संदर्भ</u>-:**
१) शासन निर्णय, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, क्र. एनजीसी २०१७/ (२९/१७)/ मशि-४, दि.१५.०९.२०१७ .
२) शासन निर्णय क्र. एनजीसी-२०२१/(०१/२१)/मशि-४, दि. १५.०४.२०२१.
३) रिट याचिका क्रमांक ६४५६/२०२१ प्रकरणी मा. उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद यांचे दिनांक ३१.०८.२०२१ रोजीचे आदेश
४) शासन आदेश क्र.न्यायाप्र-२०२१/(१६७/२१)/मशि-४, दि. ०६.०१.२०२२.
५) विशेष अनुज्ञा याचिका क्र.१६७१-१६७२/२०२२ मधील सिविल अपील क्र. १२२०७-१२२०८/२०२४ या न्यायालयीन प्रकरणी मा. सर्वोच्च न्यायालयाचे दिनांक ०५.११.२०२४ रोजीचे आदेश.

**<u>प्रस्तावना:</u>**

महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील कलम १०९ आणि संदर्भाधीन क्र.०१ येथील शासन निर्णयान्वये विहित केलेल्या कार्यपद्धती/ निकषांनुसार शैक्षणिक वर्ष २०२१-२२ करीता बनोटी, ता. सोयगाव, जि. औरंगाबाद या बिंदूकरीता श्री. भगवान महावीर बहुउद्देशीय सेवाभावी संस्था, बनोटी, ता. सोयगांव, जि. औरंगाबाद या संस्थेच्या श्री.छत्रपती शिवाजी महाराज कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय, बनोटी, ता. सोयगांव, जि. औरंगाबाद या महाविद्यालयास संदर्भाधीन क्र.०२ येथील शासन निर्णय, दिनांक १५.०४.२०२१ अन्वये इरादापत्र प्रदान करण्यात आलेले होते.

परंतु, रिट याचिका क्रमांक ६४५६/२०२१ प्रकरणी मा. उच्च न्यायालय मुंबई, खंडपीठ औरंगाबाद यांच्या दिनांक ३१.०८.२०२१ रोजीच्या आदेशास अनुसरून, प्रतिवादी संस्था श्री. भगवान महावीर बहुउद्देशीय सेवाभावी संस्था, बनोटी, ता. सोयगांव, जि. औरंगाबाद या महाविद्यालयास शासन निर्णय दिनांक १५.०४.२०२१ अन्वये प्रदान करण्यात आलेले इरादापत्र संदर्भाधीन क्र.०४ येथील दि.०६.०१.२०२२ रोजीच्या शासन आदेशान्वये रद्द करण्यात आलेले आहे.

आता, विशेष अनुज्ञा याचिका क्र.१६७१-१६७२/२०२२ मधील सिविल अपील क्र. १२२०७-१२२०८/२०२४ या न्यायालयीन प्रकरणी मा. सर्वोच्च न्यायालयाचे संदर्भाधीन क्र.०५ येथील दिनांक ०५.११.२०२४ रोजीच्या आदेशान्वये, सदर रद्द करण्यात आलेले इरादापत्र पुनर्स्थापित करण्यात आले आहे. त्यास अनुसरून याचिकादार श्री. भगवान महावीर बहुउद्देशीय सेवाभावी संस्था बनोटी, ता. सोयगांव, जि. छत्रपती संभाजीनगर या संस्थेच्या नवीन प्रस्तावित श्री. छत्रपती शिवाजी महाराज कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय, बनोटी, ता. सोयगांव, जि. छत्रपती संभाजीनगर या महाविद्यालयास शैक्षणिक वर्ष २०२१-२०२२ करीता शासन निर्णय दिनांक १५.०४.२०२१ अन्वये प्रदान करण्यात आलेले परंतु शासन आदेश दिनांक ०६.०१.२०२२ अन्वये रद्द करण्यात आलेले कायम विना अनुदान तत्वावरील इरादापत्र, शैक्षणिक वर्ष २०२५-२६ करिता पुनर्स्थापित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती .

**शासन निर्णय**:

श्री. भगवान महावीर बहुउद्देशीय सेवाभावी संस्था, बनोटी, ता. सोयगांव, जि. छत्रपती संभाजीनगर संचालित श्री. छत्रपती शिवाजी महाराज कला, विज्ञान व वाणिज्य महाविद्यालय, बनोटी, ता. सोयगांव, जि. छत्रपती संभाजीनगर या महाविद्यालयास महाविद्यालयास शैक्षणिक वर्ष २०२१-२०२२ करीता शासन निर्णय, दिनांक १५.०४.२०२१ अन्वये प्रदान करण्यात आलेले परंतु शासन आदेश दिनांक ०६.०१.२०२२ अन्वये रद्द करण्यात आलेले कायम विना अनुदान तत्वावरील इरादापत्र, शैक्षणिक वर्ष २०२५-२०२६ पासून पुनर्स्थापित करण्यात येत आहे. सदर मान्यतेच्या अनुषंगाने मूळ शासन निर्णय १५.०४.२०२१ मधील सर्व अटी व शर्ती लागू राहतील.

२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२५०६१११५२७४२०००८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ASHOK SHANKAR MANDE

Digitally signed by ASHOK SHANKAR MANDE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=fabb29d28cdbcbe5c9eed052cb38b8cb567068a0090e237f095c6e50a52a6cf5, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=D96FF33E8AF31F745D84F3411F94D896382FAA82659B10108672887A87D6FC7C, cn=ASHOK SHANKAR MANDE
Date: 2025.06.11 15:29:46 +05'30'

**(अशोक मांडे)**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत,**

१.मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई,

२.मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई,

३.मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई,

४.मा. मंत्री (उ. व तं. शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
५.मा. राज्य मंत्री (उ. व तं. शि.) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
६.अपर मुख्य सचिव (उ.व तं.शि.वि.), मंत्रालय, मुंबई,
७.संचालक, उच्च शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे,
८.विभागीय सहसंचालक, उच्च शिक्षण, छत्रपती संभाजीनगर विभाग, छत्रपती संभाजीनगर,
९.कुलसचिव, डॉ. बाबासाहेब आंबेडकर मराठवाडा विद्यापीठ, छत्रपती संभाजीनगर,
१०. कक्ष अधिकारी (विशि-५), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,
११.संबंधित संस्था (विद्यापीठामार्फत),
१२.निवडनस्ती (मशि-४).